गडहिंग्लज पंचायत समिती (जि. कोल्हापूर )
अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारतीच्या
बांधकामास प्रशासकीय मान्यता .

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २०१०/प्र.क्र.२१/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ५ मार्च, २०१०

संदर्भ :- अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,कोल्हापूर यांचे पत्र क्र.बांखा/रेशा/वशि/२२/१०,दि. ५.१.२०१०

प्रस्तावना :-

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., कोल्हापूर यांनी संदर्भीय दिनांक ५.१.२०१० च्या पत्रान्वये गडहिंग्लज पंचायत समितीच्या गटविकास अधिकारी व कर्मचारी यांच्याकरीता निवासस्थान बांधकामास प्रशासकीय मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

२. गडहिंग्लज पंचायत समितीचे गट विकास अधिकारी यांच्यासाठी सन १९७१ साली बांधण्यात आलेले निवासस्थान अतिशय जीर्ण झालेले आहे. या व्यतिरीक्त पंचायत समितीच्या अधिनस्थ उपअभियंता, बांधकाम, तालुका वैद्यकीय अधिकारी व पशुधन विकास अधिकारी यांच्या करीता निवासस्थानाची सोय नाही. त्यामुळे गट विकास अधिकारी यांचे जीर्ण झालेले निवासस्थान पाडून त्या ठिकाणी वर्ग-१ च्या अधिकाऱ्यांसाठी टाईप- IV या नमुना नकाशाप्रमाणे चार निवासस्थान बांधण्याचे प्रस्तावित आहे. या करीता रु.५५,३०,६७६/-किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर करण्यात आले आहे.

तसेच वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांसाठी बांधण्यात आलेले तीन जोड निवासस्थाने (एकूण ६) व आजरा रोडवर जनावारांच्या दवाखान्याच्या आवारातील दोन जोड निवासस्थाने (एकुण ४) बांधण्यात आलेले आहेत. त्यापैकी तहसिल कार्यालयाजवळील सहा निवासस्थाने जीर्ण व धोकादायक झालेली आहेत. पंचायत समितीकरीता सुस्थितीतील निवासस्थाने वगळता एकूण आठ निवासस्थानांची आवश्यकता असल्याने, अस्तित्वातील जीर्ण झालेल्या इमारतीचे बांधकाम इमारत पाडून त्या ठिकाणी टाईप-II या नमुना नकाशाप्रमाणे नविन निवासस्थान बांधण्याचे प्रस्तावित आहे. या करीता रु.७५,४३,१७४/- किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर करण्यात आले आहे. सदरील कामे हाती घेण्याकरीता गडहिंग्लज पंचायत समितीने दिनांक ११.१२.२००९ रोजी ठराव पारित केला आहे. अधिकारी व कर्मचारी निवासस्थानाच्या बांधकामाचे सविस्तर अंदाजपत्रक शाखा अभियंता, गडहिंग्लज यांनी तयार कले असून, उप अभियंता, बांधकाम, गडहिंग्लज व कार्यकारी अभियंता, बांधकाम, जि.प.,कोल्हापूर यांनी साक्षांकित केले आहे. सदरील अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारीत आहे. सदरील प्रस्तावासोबत गडहिंग्लज पंचायत समितीच्या ठरावाची प्रत, नमुना नकाशा, साईट प्लॅन, जीर्ण इमारतीचे फोटो इ. कागदपत्रे सादर केलेली आहेत.

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,कोल्हापूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची, मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छाननी अंती, गडहिंग्लज पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान बांधकामाच्या एकूण रु.१,३०,७४,०००/- इतक्या सविस्तर अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

गडहिंग्लज (जिल्हा-कोल्हापूर ) पंचायत समितीच्या मोडकळीस निवासस्थानांचे बांधकाम पाडून त्या ठिकाणी अधिकारी यांच्याकरीता टाईप-IV ची ४ निवासस्थाने आणि वर्ग-३ कर्मचारी यांच्याकरीता टाईप-II च्या ८ निवासस्थानांच्या अनुक्रमे रु.५५,३०,६७६/- व रु.७५,४३,१७४/- अशा एकूण रक्कम रुपये- १,३०,७४,०००/- (रुपये एक कोटी तीस लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), उत्तर विभाग, जि.प., कोल्हापूर यांनी नियोजन करावे.

(२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

(३) या कामी मंजूर प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

३. गडहिंग्लज पंचायत समितीच्या वर्ग-१ अधिकारी निवासस्थान व कर्मचारी निवासस्थानाच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| GENERAL ABSTRACT FOR CLASS-I OFFICER RESI.QUARTER (TYPE-IV) | | |
|---|---|---|
| Sr. | Work Details | Amount (in Rupees) |
| 1 | Construction Cost of Building | 4221890.00 |
| 2 | Add 2% Comutterization charges | 84438.00 |
| 3 | Add 11 % Electrification charges | 464408.00 |
| 4 | Add 8 % Health & water supply charges | 337751.00 |
| 5 | Add 6% Other charges | 253313.00 |
| 6 | Add 4% Contengencies charges | 168876.00 |
| 7 | Estimated cost Rs. | 5530676.00 |
| (A) | Say | Rs.55,31,000/- |

| GENERAL ABSTRACT FOR RESI. STAFF QUARTERS TYPE-II | | |
|---|---|---|
| Sr. | Work Details | Amount (in Rupees) |
| 1 | Construction Cost of Building | 5758148.00 |
| 2 | Add 2% Comutterization charges | 115163.00 |
| 3 | Add 11 % Electrification charges | 633396.00 |
| 4 | Add 8 % Health & water supply charges | 460652.00 |
| 5 | Add 6% Price variation charges | 345489.00 |
| 6 | Add 4% Contengencies charges | 230326.00 |
| 7 | Estimated cost Rs. | 7543174.00 |
| (B) | Say | Rs. 7543000/- |
| | TOTAL (A) + (B) | Rs. 1,30,74,000/- |

४. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने-(२५१५१२५६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. या कामी मुख्य अभियंता, सा.बां.वि. किंवा मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, पुणे यांच्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेवून, त्याची प्रत शासनास सादर करावी.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

७. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००३०५१७२१४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

C:\DO_RRD_PARA7\BLDG PROPOSAL\PSE 2010-C.R.21 Gadhinglaj_Resi. Quar (Kolhapur) .doc

प्रत,

१) विभागीय आयुक्त पुणे विभाग, पुणे
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस,मध्यवर्ती इमारत, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर
५) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर
६) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद कोल्हापूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोल्हापूर
८) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
९) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा पुणे विभाग, पुणे
१०) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोल्हापूर
११) सभापती, पंचायत समिती, गडहिंग्लज, जिल्हा कोल्हापूर
१२) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, गडहिंग्लज, जिल्हा कोल्हापूर
१३) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१६) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई